**सामाजिक वनीकरण या विषयाशी संबंधित कार्यासने व पदे वन विभागाकडे हस्तांतरित करणे. श्री वि.रा.खेडेकर, अ.स. यांच्या सेवा हस्तांतरित करणे**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : असब १२१५/प्र.क्र. ७७ /का.चौदा**
मादामा कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक : ०३.०७.२०१५

**संदर्भ -** **१.शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.संकीर्ण २०१४/११८,/फ-१, दि.४.१२.२०१४**
**२. मंत्रीमंडळ निर्णय दि.२७.११.२०१४**
**३. शासन निर्णय, ग्रा.वि. व ज.सं. विभाग क्र.संकीर्ण २५१४/प्र.क्र.४९९/आस्था.१, दि.८.०४.२०१५**

**शासन निर्णय**

महसूल व वन विभागाच्या शासन निर्णय, क्र.संकीर्ण २०१४/११८/फ-१, दि.४.१२.२०१४ अन्वये ग्राम विकास व जलसंधारण विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली असलेले सामाजिक वनीकरण संचालनालय महसूल व वन विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली आणण्यात आले आहे. मंत्रीमंडळाने दिनांक २७ नोव्हेंबर,२०१४ रोजी घेतलेल्या निर्णयानुसार सामाजिक वनीकरण योजना व ती हाताळणारा कर्मचारी वर्ग ग्रामविकास व जलसंधारण विभागाकडून महसूल व वन विभागाकडे वर्ग होणे आवश्यक आहे. या अनुषंगाने ग्रामविकास व जलसंधारण विभागाच्या आस्थापनेवर सामाजिक वनीकरण हा विषय हाताळणारी कार्यासने जल-१२ व जल-१३ या दोन्ही कार्यासनात सध्या हाताळण्यात येणारे कामकाज, संपूर्ण अभीलेखासह तसेच तेथील ८ अधिकारी/ कर्मचाऱ्यांसह महसूल व वन विभागाकडे उपरोक्त दि.८.०४.२०१५ च्या शासन निर्णयानुसार हस्तांतरित करण्यात आले आहेत. याशिवाय नोव्हेंबर,२०१४ पर्यंत सामाजिक वनीकरण विषय हाताळणारे श्री. वि.रा.खेडकर, अवर सचिव, ग्राम विकास विभाग यांच्या सेवा महसूल व वन विभागात वर्ग कराव्यात अशी वन विभागाची मागणी आहे.

ही बाब विचारात घेऊन ग्रामविकास व जलसंधारण विभागातील अवर सचिवाचे एक पद त्यावर कार्यरत श्री.वि.रा.खेडेकर, यांच्या सेवेसह मंत्रीमंडळाच्या निर्णयानुसार तसेच शासन मान्यतेने महसूल व वन विभागाकडे हस्तांतरित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७०३१२०४०९३७०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Satish Karbhari Jondhale
Digitally signed by Satish Karbhari Jondhale
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=GAD, postalCode=400020, st=Maharashtra, cn=Satish Karbhari Jondhale
Date: 2015.07.03 12:05:16 +05'30'

**स.का.जोंधळे**
उपसचिव महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३. अ.मु.स.(सेवा), सा.प्र.वि.,
४. अमुस/प्रधान सचिव/सचिव - ग्रा.वि व ज.सं.वि/म.व व.वि
५. सह/उप सचिव/(आस्थापना), ग्रा.वि व ज.सं.वि/म.व व.वि
६. संबंधित अधिकारी (विभागामार्फत)/ निवड नस्ती.